**शासनाच्या "लॉक डाऊन" च्या कालावधीमध्ये राज्य शासकिय / जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थांना मंजूर करण्यात आलेल्या घरबांधणी कर्जाच्या / व्याजाच्या वसुली बाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. : वसुली १०२०/प्र.क्र. ७२०/१९-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ जून, २०२०

वाचा:-

१) सहकार , पणन व वस्त्रोद्योग, विभाग शासन परिपत्रक क्रमांक: वसुली ४४०५/ प्र. क्र. ७२९/१९-स, दि.०१/१०/२००५

२) सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन परिपत्रक क्रमांक : वसुली १०११/ प्र.क्र.८६९/१९-स , दि. २५/०८/२०११

**शासन परिपत्रक:-**

राज्य शासकीय कर्मचारी व जिल्हा परिषद कर्मचारी यांनी शासनाच्या गटविमा योजने अंतर्गत घेतलेल्या कर्जाची वसुली त्यांच्या वेतनातून कर्जाचा पहिला हप्ता प्राप्त झाल्यानंतर दोन वर्षांनी दरमहा त्यांच्या वेतनातुन करण्यात येते. सर्वसाधारण कर्मचाऱ्याच्या उर्वरित सेवेचा कालावधी लक्षात घेवून वसुलीचे हप्ते ठरविलेले असतात. जे कर्मचारी त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत कर्जाची परतफेड करत नाहीत त्यांना या कार्यालयाकडून ना-देय प्रमाणपत्र निर्गमित केले जात नाही व त्यांचे निवृत्तीवेतन रोखून ठेवण्यात येते परंतु या कार्यालयाकडून ना-देय प्रमाणपत्र निर्गमित केल्यास सदर कर्मचाऱ्याचे निवृत्ती वेतन त्याला प्राप्त होते. तथापी बहुतांश कर्मचाऱ्यांची परतफेड त्याच्या वेतनातून होत नाही अशा वेळेस संबंधीत कर्मचारी त्यांच्या सेवा निवृत्ती दिनांकापुर्वी या कार्यालयात येवून चलन प्राप्त करून कर्ज व त्यावरील व्याजाचा भरणा भारतीय रिझर्व बँक, मुंबई येथे करून सदर चलने या कार्यालयात सादर करतात. सदर चलनांची शहानिशा करून त्यांना ना-देय प्रमाणपत्र निर्गमित करण्यात येते. जेणेकरुन त्यांचे निवृत्तीवेतन मिळण्यास त्यांना अडचण निर्माण होत नाही.

२. भारतामध्ये कोविड -१९ चा प्रादुर्भाव फेब्रुवारी २०२० पासून जाणवू लागला. बहुतांश नागरिक करोना संसर्गाची शिकार होवू लागले त्यावर प्रतिबंधीत उपाय म्हणून केंद्र व राज्य शासनाने दि. २३ मार्च २०२० पासून लॉकडाऊन लागू केला तेव्हापासून कार्यासन १९-स, नियमीत चालू राहू शकले नाही या कालावधीत मार्च, एप्रिल व मे या महिन्यांत सेवा निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना ना-देय प्रमाणपत्र निर्गमित करण्यात आलेले नाहीत. संबंधीत कर्मचारी महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून या कार्यालयाशीसंपर्क साधत असतात परंतु वाहतूक व कार्यालय बंद असल्याकारणाने संबंधीत कर्मचारी त्यांच्या वसूल झालेल्या रक्कमेचा तपशिल उपलब्ध नाही. महाराष्ट्र शासनाने दिनांक ८ जून, २०२० पासून काही प्रमाणत लॉकडाऊनचे प्रतिबंध शिथिल केले असले तरीही खालील कारणास्तव संबंधीत कर्मचारी त्यांच्या वसुलीचे अहवाल सादर करू शकत नाही.

i. कार्यासन १९-स , हे न्यू इंडिया एश्युरन्स बिल्डिंग , ३ रा मजला , फोर्ट, मुंबई -०१ येथे असल्याने न्यू इंडिया एश्युरन्सच्या व्यवस्थापनाने दिनांक ३० जून, २०२० पर्यंत कोणत्याही अभ्यांगतांना प्रवेश निषिध्द केलेला असल्याने कर्ज धारकांस या कार्यासनात येण्याकरिता प्रवेश नाकारला जातो.

ii. भारतीय रिझर्व बँक , मुंबई यांनी १०० टक्के व्यवहार चेकद्वारे सुरु केलेले असल्याने संबंधीत सभासद नेमहीप्रमाणे रोख रक्कम घेवून येतात त्यामुळे त्यांचे व्यवहार पूर्ण होत नाहीत.

३. वरील सर्व कारणास्तव सभासदांचे ना-देय प्रमाणपत्र प्रलंबित असल्या कारणाने त्यांना त्यांचे निवृत्ती वेतन मिळण्यास उशिर होत आहे. तथापी खालीलप्रमाणे कार्यवाही करून संबंधीत सभासदांचे ना-देय प्रमाणपत्र निर्गमित करणे शक्य होईल.

i. संबंधीत सभासदांनी त्यांच्या वसुलीची माहिती अथवा शासनाकडून गटविमा योजनेअंर्तगत घेतलेल्या कर्जा संबंधीची कोणतीही माहिती त्यांच्या कार्यालय प्रमुखांच्या स्वाक्षरीसह कार्यालयीन ई-मेल वरूनच या कार्यालयाचा ई-मेलवर पाठवावी.

ii. ना-देय प्रमाणपत्र त्यांच्या कार्यालयाच्या ई-मेलवरच पाठविण्यात येईल. संबधीत गृहनिर्माण संस्थेला प्रत देण्याची जबाबदारी त्या सभासदाची असेल.

iii. सभासदाने त्याला देय असलेल्या कर्ज व व्याजाच्या रक्कम शासनाच्या “GRASS” या प्रणाली मार्फतच अदा करव्यात.

iv. ई-मेलवर प्राप्त झालेले ना-देय प्रमाणपत्राच्या इतर प्रती काल्र्यालय प्रमुखांनी साक्षांकीत करून द्याव्यात.

४. सदर शासन परिपत्रक महराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००६२४११५५२३९४०२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावने.

या कार्यालयाचा ई-मेल पत्ता ashokbhujbal03@gmail.com असा असून संबंधीतांनी या ई-मेल व्दारेच पत्र व्यवहार करावा.

ASHOK SHANKAR BHUJBAL

Digitally signed by ASHOK SHANKAR BHUJBAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa9581722, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fdb9a467c1125b3a23797088f3433a330c41502619eaa43bd29e751716ff3946, ou=CO OPERATION TEXTILE AND MARKETING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ASHOK SHANKAR BHUJBAL
Date: 2020.06.24 12:02:19 +05'30'

**( अशोक भुजबळ )**
कक्ष अधिकारी

**प्रत:-**

१) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२) उप मुखमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख, पदेशिक कार्यलय प्रमुख व कार्यालय प्रमुख.
४) संचाकल, माहिती व जनसंर्पक महासंचनालय, मंत्रालय मुंबई.
५) संचालक , माहिती व तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त.
७) सर्व जिल्हाधिकारी.
८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी .
९) सहकार आयुक्त ब निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) साखर आयुक्त महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) संचालक , हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग विभाग, महाराष्ट्र राज्य नागपूर.

१२) पणन संचालक पुणे.

१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सकारी संस्था(प्रशासन/ लेखापरिक्षण)

१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहाकारी संस्था.

१५) प्रबंधक, उच्च न्ययालय (मुळ शाखा)/ (अपिल शाखा) मुंबई.

१६) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायप्राधिकरण मुंबई.

१७) सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय मुंबई.

१८) सचिव, महाराष्ट्र, लोकसेवा आयोग, मुंबई.

१९) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय मुंबई

२०) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने.

२१) कार्यासन अधिकारी, १८-स (५ प्रति)

२२) कार्यासन अधिकारी १७-स

२३) कार्यासन अधिकारी १९-स.

(कृपया संबंधीतांनी सदर परिपत्रकाची प्रत त्यांच्या अखत्यारीतील कार्यालयाच्या नजरेत आणावी हि विनंती)